**सहायक नियंत्रक, शिधावाटप,गट-ब (राजपत्रित) या संवर्गातील अधिकारी यांची दिनांक ०१ जानेवारी, २०२५ रोजीची स्थिती दर्शविणारी अंतिम सेवाज्येष्ठता यादी.**

**महाराष्ट्र शासन**
**अन्न, नागरी पुरवठा व ग्राहक संरक्षण विभाग**
**शासन परिपत्रक क्र.ज्येष्ठता-२१२५/प्र.क्र.०२/ना.पु.१५**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई ४०० ०३२.
दिनांक : २८ एप्रिल, २०२५.

**संदर्भ:-** १) शासन अधिसूचना, सामान्य प्रशासन विभाग, क्र.एसआरव्ही २०१६/ प्र.क्र.२८१/१२, दि.२१.०६.२०२१
२) शासन निर्णय क्र.: आस्थाप्र-१८२२/प्र.क्र.७२/नापु.१२, दि. ०४.१२.२०२४
३) शासन परिपत्रक समक्रमांक दि. ०३.०२.२०२५.

**प्रस्तावना :-**

संदर्भ क्र. ३ येथील शासन परिपत्रकान्वये मुंबई-ठाणे शिधावाटप यंत्रणेतील सहायक नियंत्रक, शिधावाटप, गट-ब (राजपत्रित) पदाची दि.०१.०१.२०२५ ची स्थिती दर्शविणारी तात्पुरती सेवाज्येष्ठता यादी प्रसिध्द करण्यात आली होती. सदर सेवाज्येष्ठता यादीबाबत संबंधित अधिकाऱ्यांकडून प्राप्त आक्षेपांची पूर्तता करण्यात येऊन, विभागाच्या अधिनस्त मुंबई-ठाणे शिधावाटप यंत्रणेतील सहायक नियंत्रक, शिधावाटप, गट-ब (राजपत्रित) या संवर्गाची दि.०१.०१.२०२५ ची स्थिती दर्शविणारी अंतिम सेवाज्येष्ठता यादी प्रसिध्द करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन परिपत्रक :-**

विभागाच्या अधिनस्त मुंबई-ठाणे शिधावाटप यंत्रणेतील सहायक नियंत्रक, शिधावाटप, गट-ब (राजपत्रित) या पदावरील अधिकारी/कर्मचारी यांची **दि.०१.०१.२०२५** रोजीची स्थिती दर्शविणारी **अंतिम सेवाज्येष्ठता यादी** सोबतच्या **परिशिष्ट "अ"** मध्ये प्रसिद्ध करण्यात येत आहे.

२. संदर्भ क्र. १ येथील दिनांक २१.०६.२०२१ रोजीच्या अधिसूचनेन्वये महाराष्ट्र नागरी सेवा (ज्येष्ठतेचे विनियमन) नियमावली, २०२१ मधील नियम ३ (२) अनुसार सेवाज्येष्ठता यादीतील ज्येष्ठतेचा दिनांक व ज्येष्ठतेचा क्रमांक निश्चित करण्यात आला आहे.

३. संदर्भ क्र. २ येथील शासन निर्णय, दि.०४.१२.२०२४ अन्वये विभागाच्या अधिनस्त पुरवठा आयुक्त कार्यालय, मुंबई येथील ०२ सहायक संचालक यांचे त्यांनी दिलेल्या इच्छुकतेनुसार मुंबई-ठाणे शिधावाटप यंत्रणेतील आस्थापनेवर समकक्ष वेतनश्रेणी असलेल्या सहायक नियंत्रक, शिधावाटप, गट-ब (राजपत्रित) या संवर्गात समायोजन करण्यात आले आहे.

सदर शासन निर्णयातील मुद्दा क्र.२(i) "**सेवा ज्येष्ठता** : सामान्य प्रशासन विभाग, दि.२१.०६.२०२१ च्या म.ना.से. (ज्येष्ठतेचे विनियम) नियमावली, २०२१ मधील नियम क्र.३ (१) मधील शेवटच्या परंतुकानुसार ज्येष्ठतेचा दिनांक निश्चित करण्यात यावा. पुरवठा आयुक्त कार्यालयातील कार्यरत अधिकारी/कर्मचारी यांना समकक्ष वेतनश्रेणीवर ज्यासंवर्गात समायोजन करण्यात येईल, अशा समकक्ष संवर्गात नियुक्ती झालेल्या दिनांकापासूनची त्यांची ज्येष्ठता विचारात घेण्यात यावी." या तरतूदीनुसार सोबतच्या ज्येष्ठता यादीतील अ.क्र.२ व अ.क्र.३ येथील अधिकारी/कर्मचारी यांच्या सेवाज्येष्ठतेचा दिनांक हा त्यांच्या मुंबई-ठाणे शिधावाटप यंत्रणेतील सहायक नियंत्रक, शिधावाटप, गट-ब (राजपत्रित) संवर्गातील नियुक्तीचा दिनांक ३०.१२.२०२४ हा ज्येष्ठतेचा दिनांक म्हणून देण्यात आलेला आहे.

४. सदर शासन परिपत्रक महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आले असून त्याचा संकेतांक २०२५०४२८१६३१३०९१०६ असा आहे. हे परिपत्रक डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करून काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

JAGDISH MANIK KHEDKAR

Digitally signed by JAGDISH MANIK KHEDKAR
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=FOOD CIVIL SUPPLIES AND CONSUMER PROTECTION DEPARTMENT, 2.5.4.20=bb551fb9794bc66bec3b1d1e67d9d371cf84929ab9fe6c6f1f6c908554cd901d, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=87C9F49EEFE8DE748DFC03D64003C379C5F217EF3F6D86E7E73F9826340410B2, cn=JAGDISH MANIK KHEDKAR
Date: 2025.04.28 16:32:18 +05'30'

**(जगदिश मा. खेडकर)**
**कक्ष अधिकारी, महाराष्ट्र शासन**

**सोबत**: परिशिष्ट '**अ**'

**प्रत,**

१) नियंत्रक, शिधावाटप व संचालक, नागरी पुरवठा, मुंबई.
२) सर्व उप नियंत्रक, शिधावाटप.
३) सर्व सहायक नियंत्रक, शिधावाटप.
४) निवड नस्ती, ना.पु. १५.

| शासन परिपत्रक, अन्न, नागरी पुरवठा व ग्राहक संरक्षण विभाग, क्रमांक: ज्येष्ठता-२१२५/प्र.क्र.०२/ना.पु.१५, दिनांक: २८ एप्रिल,२०२५ सोबतचे परिशिष्ट-अ | | | | | | | | | |
|---|---|---|---|---|---|---|---|---|---|
| १. संवर्गाचे नाव : सहायक नियंत्रक, शिधावाटप, गट-ब (राजपत्रित) | | | | | | | | | |
| २. वेतनश्रेणी : एस -१७ : ४७६००-१५११०० | | | | | | | | | |
| ३. दिनांक ०१ जानेवारी, २०२५ रोजीची अंतिम सेवाज्येष्ठता यादी (दि.०१.०१.२०२४ ते ३१.१२.२०२४ या कालावधीत कार्यरत अधिकारी) | | | | | | | | | |
| नियम ३ (२) (ब) नुसार ज्येष्ठता क्रमांक | श्री./ श्रीम. | शासकीय अधिकाऱ्याचे नाव | संबंधित पदावरील नियुक्तीचा मार्ग | जन्म दिनांक | प्रवर्ग | नियम ३ (२) (अ) नुसार संवर्गात प्रत्यक्ष रूजू दिनांक | ज्येष्ठतेचा दिनांक | सेवानिवृत्तीचा दिनांक | शेरा |
| १ | २ | ३ | ४ | ५ | ६ | ७ | ८ | ९ | १० |
| १. | श्री. | रामकृष्ण नेमाजी कांबळे | पदोन्नती | ०१.०६.१९६८ | भ.ज.(क) | १९.१०.२०२२ | १४.१०.२०२२ | ३१.०५.२०२६ | - |
| २. | श्रीम. | कुंदा शरद कुराडे | समायोजन | ०३.११.१९६७ | वि.मा.प्र. | ३०.१२.२०२४ | ३०.१२.२०२४ | ३०.११.२०२५ | मुंबई-ठाणे शिधावाटप यंत्रणेतील सहायक नियंत्रक,शिधावाटप, गट-ब(राजपत्रित) या पदावर समायोजनाने रुजू |
| ३. | श्रीम. | माधुरी आनंदराव शिंदे | समायोजन | १३.०२.१९७३ | खुला | ३०.१२.२०२४ | ३०.१२.२०२४ | २८.०२.२०३१ | |

JAGDISH MANIK KHEDKAR

Digitally signed by JAGDISH MANIK KHEDKAR
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=FOOD CIVIL SUPPLIES AND CONSUMER PROTECTION DEPARTMENT, 2.5.4.20=bb551fb9794bc66bec3b1d1e67d9d371cf84929ab9fe6c6f1f6c908554cd901d, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=87C9F49EEFE8DE748DFC03D64003C379C5F217EF3F6D86E7E73F9826340410B2, cn=JAGDISH MANIK KHEDKAR
Date: 2025.04.28 16:32:44 +05'30'

(जगदिश मा. खेडकर)
कक्ष अधिकारी, महाराष्ट्र शासन